सन २०१४-१५ मध्ये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत (NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन आणि जमिनीची उत्पादनक्षमता (SHM) या घटकांतर्गत मृद आरोग्य पत्रिका वितरण हा कार्यक्रम राबविण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मृदस १४१५ / प्र.क्र. ७५ /१७ अे**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**

**तारीख: ३१ मार्च,२०१५**

**वाचा :**

१) शासन निर्णय क्र.शाशेअ २०१४ /प्र.क्र. ८६ / ४ अे दिनांक २१ एप्रिल २०१४

२) केंद्र शासनाचे www.agricoops.nic.in या संकेत स्थळावर निर्गमित केलेल्या मृद आरोग्य पत्रिका योजनेच्या मार्गदर्शक सुचना

३) केंद्र शासनाचे पत्र क्र. १-१ / २०१४ Fert. Use ( ix) दिनांक ३० डिसेंबर २०१४

४) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. मृदस१४१५/प्रक्र७५/१७अे,दि.१८ फेब्रुवारी, २०१५

५) केंद्र शासनाचे पत्र क्र. १-२/ २०१४ Fert. Use ( xv) दिनांक २२ जानेवारी २०१५

६) शासन निर्णय क्रमांक, कृषि व पदुम विभाग क्र. पुनर्वि-२०१५/(प्र.क्र.४६/१५)/२-अे, दि.३१/३/२०१५

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने सन २०१४-१५ पासुन केंद्र पुरस्कृत योजनांची पुर्नरचना केली असुन काही योजना एकत्रित करून अभियान म्हणुन राबविण्याचे निश्चित केले आहे. सदर पुर्नरचनेमध्ये राष्ट्रीय सुक्ष्म सिंचन अभियान ( NMMI), राष्ट्रीय सेंद्रिय शेती प्रकल्प ( NPOF), राष्ट्रीय मृदा आरोग्य व सुपिकता व्यवस्थापन प्रकल्प ( NPMSH & F) आणि कोरडवाहू शाश्वत शेती कार्यक्रम ( RADP) या सर्व योजना एकत्रितरित्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान ( NMSA) म्हणुन राबविण्यात येणार आहे. या अभियानामध्ये पुढील घटकाचा समावेश करण्यात आला आहे.

१) अवर्षणप्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (RAD)

२) शेतीवरील पाणी व्यवस्थापन अभियान ( OFWM)

३) मृदा आरोग्य व्यवस्थापन आणि जमिनीची उत्पादनक्षमता ( SHM)

४) वातावरण बदल आणि शाश्वत शेती : सनियंत्रण, रचना व संजालन (CCSAMMN).

वरील पैकी मृद आरोग्य व्यवस्थापन व जमिनीची उत्पादन क्षमता ( SHM ) उपअभियानातंर्गत मृद आरोग्य व्यवस्थापन आणि जमिनीची उत्पादन क्षमता वाढविणे, एकात्मिक पोषण व्यवस्थापन तसेच सेंद्रिय शेती या घटकाचा समावेश करण्यात आला आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये राष्ट्रीय शाश्वत अभियानातंर्गत मृद आरोग्य व्यवस्थापन आणि जमिनीची उत्पादन क्षमता या घटकांतर्गत १० फिरत्या मृद प्रयोगशाळा स्थापन करण्याकरीता रू. ५०४.०० लाख निधी वितरीत करण्यास मंजुरी दिली होती. त्यानुसार संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये रू. ५०४.०० लाख निधी वितरीत करण्यात आला आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र. ५ येथील दि. २२ जानेवारी, २०१५ च्या पत्रान्वये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत मृद आरोग्य व्यवस्थापन आणि जमीनीची उत्पादनक्षमता या घटकातंर्गत मृद आरोग्य पत्रिका वितरण कार्यक्रम राबविण्याकरीता केंद्र व राज्य हिस्सा ( ७५ : २५) याप्रमाणे केंद्र हिस्सा रू. २१५.९६ लाख एवढ्या रकमेच्या कार्यक्रमास मान्यता दिलेली आहे. केंद्र शासनाच्या सदर मंजुरीनुसार रू. २१५.९६ लाख ( दोन कोटी पंधरा लाख श्याहनऊ हजार फक्त) एवढ्या रक्कमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०१४-१५ मध्ये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत मृद आरोग्य व्यवस्थापन या उपअभियाना खालील मृद आरोग्य पत्रिका वितरण कार्यक्रम राबविण्याकरीता केंद्र शासनाने दिलेल्या मंजुरीनुसार ७५ % केंद्र हिस्सा रू. २१५.९६ लाख ( दोन कोटी पंधरा लाख श्याहनऊ हजार फक्त ) निधीच्या खर्चासह राबविण्यास शासनाची प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजनेचे भौतिक व आर्थिक लक्ष्य खालील प्रमाणे आहे :-

(रू. लाखात)

| **मृद आरोग्य पत्रिका** | | **मृद विश्लेषकांचे प्रशिक्षण** | | **क्षमता वृध्दी** | | | | | **अभियान व्यवस्थापन** | **एकूण** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **मृद नमुने संख्या** | | | | **शेतकरी प्रशिक्षण** | | **संलग्न कर्मचारी प्रशिक्षण** | | **आयसीटी** | | |
| | आर्थिक | भौतिक | आर्थिक | भौतिक | आर्थिक | भौतिक | आर्थिक | आर्थिक | | |
| ५४७३३१ | १८८.८३ | २० | ९.०० | १४ | २.५२ | १४ | ३.७८ | ९.६९ | २.१४ | २१५.९६ |

या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी मंजुर केलेल्या अनुदानातुन भागाविण्यात येऊन खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. डी-३**

**२४०२,मृद व जलसंधारण.**

**(१०१) मृद सर्वेक्षण व चाचणी**

**( ००) (१३) मृद आरोग्य व्यवस्थापन आणि जमिनीची उत्पादन क्षमता**

**( २४०२ १०४६) केंद्र पुरस्कृत**

**३३-अर्थसहाय्य**

**सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे**.

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन अनु.क्र.२ येथील मार्गदर्शक सुचनानुसार व संदर्भ क्र. ५ येथील पत्रात नमुद केलेल्या अटी व शर्तीनुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखापरिक्षण केलेला अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावा.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबीवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र शासनास पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमाखर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमुद करण्यात यावे जेणेकरून पारदर्शी स्वरूपात सदर रकमा विचारात घेता येतील व संदीग्धता राहणार नाही.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजुर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही, या बाबत कृषि संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण ) कृषि आयुक्तालय, पुणे. यांनी आवश्यक ती दक्षता घ्यावी.

कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य-पुणे हे योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणुन काम पाहतील व सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे /वित्तीय अधिका-यांना मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे

अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७९/२०१५/व्यय-१ दि.३०/०३/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक पुनर्वि२०१५/ प्र.क्र.४६/१५/२अे दि.३१/०३/२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेने तसेच अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३३११६४१५२५९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Akusing Narshi Vasave

Digitally signed by Akusing Narshi Vasave
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Akusing Narshi Vasave
Date: 2015.03.31 16:52:58 +05'30'

**(आ.न. वसावे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, पुणे
३) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
४) सर्व संचालक / सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे
५) सर्व विभागीय कृषि सहसंचालक मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
६) अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक (कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१०) नियोजन विभाग-१४३१
११) कार्यासन (२ओ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती